

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग,**
मंत्रालय (विस्तार), दालन क्र.५५७, ५ वा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मुंबई-४०० ०३२.

दूरध्वनी क्रमांक-२२७९३३४४ Email ID : desk१४gad-mh@gov.in

........................................................................................................................

क्रमांक: प्रतिनि-२०२२/सं.क्र.४/प्र.क्र.१/का.१४ दिनांक : २१ जानेवारी, २०२२.

प्रति,

सह /उप सचिव,
सर्व मंत्रालयीन विभाग (आस्थापना),
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

**विषय-** अवर सचिव संवर्गातून प्रतिनियुक्तीने पद भरण्याबाबत -
मा.राज्यपालांचे सचिव कार्यालयाच्या आस्थापनेवरील अवर सचिव (प्रशासन) हे पद प्रतिनियुक्तीने भरण्याबाबत.

**संदर्भ**:- राज भवन सचिवालय क्र.राजभ/रास/आस्था-१/अस/प्र.क्र.१२७/२०२१/१५८३, दि.०१.१२.२०२१ रोजीचे पत्र.

महोदय/महोदया,

उपरोक्त संदर्भाधीन पत्रान्वये महाराष्ट्राचे मा.राज्यपाल यांचे सचिव कार्यालयाच्या आस्थापनेवरील "अवर सचिव (प्रशासन)" (वेतनस्तर एस-२३: ६७,७००-२,०८,७००/-) हे पद मंत्रालयीन अवर सचिव संवर्गातून प्रतिनियुक्तीने भरावयाचे आहे.

२. त्यानुषंगाने आपल्या विभागातील सर्व अवर सचिवांना सदर प्रतिनियुक्तीबाबत अवगत करावे. इच्छुक अवर सचिवांचे नांव त्यांचे मागील पाच वर्षांच्या गोपनीय अहवालांच्या प्रमाणित प्रतींसह, वैयक्तिक माहिती (Bio-data), संपूर्ण सेवा तपशील (कालावधी, विभाग, पद), ना-विभागीय चौकशीचे प्रमाणपत्र व विभागाचे ना-हरकत प्रमाणपत्र इ. माहिती या विभागाकडे दि.११.०२.२०२२ पर्यंत निश्चितपणे प्राप्त होतील अशा रितीने पाठविण्यात यावी. तसेच कोणीही अधिकारी इच्छुक नसल्यास "निरंक" असेही या विभागास कळवावे, ही विनंती.

३. सदर शासन पत्राची प्रत महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२२०१२८१३२३३४१९०७ असा आहे. सदर पत्र डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात आले आहे.

आपला,

Gajanan Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a5b973b0795ae988a7c005050f9180a8021798a5c1ed41ada8a72725a47b4f0, serialNumber=54b11b1ccbdc577d71dce3b313c3fef5dc2ad659e360f73b682d6b6fccb8aecf, cn=Gajanan Bhimrao Gurav
Date: 2022.01.28 13:27:56 +05'30'

(ग.भि.गुरव)
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**सोबत:-विवरणपत्र.**

प्रत- निवडनस्ती सा.प्र.वि./कार्यासन-१४.

## विवरणपत्र

| अ.क्र. | मुद्दा | तपशिल/अभिप्राय |
|---|---|---|
| १ | अधिकारी/ कर्मचाऱ्यांचे संपूर्ण नाव | |
| २ | जन्मदिनांक | |
| ३ | शैक्षणिक अर्हता | |
| ४ | स्थायित्व प्रमाणपत्र | |
| ५ | भ्रमणध्वनी क्रमांक | |
| ६ | मागील ५ वर्षाच्या गोपनीय अहवालाच्या (साक्षांकित प्रतीसह) छायाप्रती (मूळ गोपनीय अहवाल पाठवू नयेत.) | |
| ७ | मत्ता व दायित्वे सादर केली आहेत का? | |
| ८ | ५०/५५ व्या वर्षी पुनर्विलोकन केले आहे का? (लागू असल्यास) | |
| ९ | संबंधित अधिकाऱ्याला यापूर्वी प्रतिनियुक्ती दिली असल्यास तपशील (पद व कालावधी) (प्रतिनियुक्तीचा एकूण कालावधी १० वर्षापेक्षा जास्त नसावा) | दिनांकापासून ते दिनांकापर्यंत \| पद /प्रतिनियुक्तीचे ठिकाण<br>एकूण कालावधी |
| १० | मागील प्रतिनियुक्तीवरून परत आल्याच्या दिनांकापासून ३ वर्षे पूर्ण झाली आहेत का? | |
| ११ | संबंधित अधिकाऱ्यांविरूध्द विभागीय चौकशी सुरू अथवा प्रस्तावित आहे काय? | |
| १२ | प्रतिनियुक्तीकरीता निवड झाल्यास विभाग कार्यमुक्त करेल किंवा कसे. | |